**श्री.सुभाष देसाई, मा.मंत्री (उद्योग) यांनी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांची मौजे गोंदेदुमाला आणि वाडिवरे, ता.इगतपुरी, जि.नाशिक येथील अधिग्रहीत जमीन गैर अधिसूचीत करण्याच्या घेतलेल्या निर्णयाबाबत चौकशी करण्याबाबत**

**श्री.के.पी.बक्षी, निवृत्त अपर मुख्य सचिव, एक सदस्सीय समिती यांची नियुक्ती करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एमआयएन-१२१७/ प्र.क्र.१८८/ १७/ २१**

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २८ ऑगस्ट, २०१७.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाची मौजे गोंदेदुमाला आणि वाडिवरे, ता.इगतपूरी, जि.नाशिक येथील अधिग्रहीत जमीन गैर अधिसुचीत करण्याच्या श्री.सुभाष देसाई, मा.मंत्री, उद्योग यांनी घेतलेल्या निर्णयाबाबत विधानसभा व विधान परिषद सदस्यांनी विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहात उपस्थित केलेल्या आरोपांची चौकशी करण्याचे मा.मुख्यमंत्री महोदय यांनी आश्वासन दिले आहे. मा.मुख्यमंत्री महोदयांनी दिलेल्या सदर आश्वासनाच्या अनुषंगाने चौकशी करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

१. श्री.सुभाष देसाई, मा.मंत्री (उद्योग) यांनी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांची मौजे गोंदेदुमाला आणि वाडिवरे, ता.इगतपूरी, जि.नाशिक, येथील अधिग्रहीत जमीन गैर अधिसुचीत करण्याच्या घेतलेल्या निर्णयाबाबत चौकशी करण्यासाठी श्री.के.पी.बक्षी, निवृत्त अपर मुख्य सचिव, एक सदस्सीय समिती यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

२. सदर चौकशीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहिल:-

अ) प्रश्नाधीन औद्योगिक क्षेत्रातील जमीन गैर अधिसुचित करण्याचा निर्णय घेण्यापूर्वी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांनी मागील १५ वर्षात अन्य औद्योगिक क्षेत्रात व प्रश्नाधीन औद्योगिक क्षेत्रात जमीन गैर अधिसुचित करण्याचा निर्णय घेतला आहे का ?

आ) उक्त क्षेत्र गैरअधिसुचित करताना महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या अधिनियम अथवा महामंडळाच्या जमीन विषयक अधिनियम/ नियम/ मार्गदर्शक तत्वे यांच्यानुसार गैरअधिसुचित करण्यात आले आहे का ?

इ) उक्त क्षेत्र गैर अधिसुचित प्रकरणी Conflict of Interest निदर्शनास येतो का?

ई) उक्त प्रकरणाच्या अनुषंगाने अन्य इतर महत्वाच्या त्रूटी/ उणीवा निदर्शनास येतात का ?

३. उपरोक्त चौकशीच्या अनुषंगाने लागणारा संपूर्ण अभिलेख मागविण्याचे तसेच चौकशीच्या अनुषंगाने संबंधीत अधिकारी/कर्मचारी यांना चौकशीस बोलाविण्याचे अधिकार श्री.के.पी.बक्षी, निवृत्त अपर मुख्य सचिव, एक सदस्सीय समिती यांना असतील.

४. उद्योग,ऊर्जा व कामगार विभागाने तसेच महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने आवश्यक ती सर्व कागदपत्रे चौकशी समितीस त्वरीत उपलब्ध करुन द्यावीत.

५. उद्योग,ऊर्जा व कामगार विभागाने श्री.के.पी.बक्षी, निवृत्त अपर मुख्य सचिव, एक सदस्सीय समिती यांना कार्यालयीन जागा, कर्मचारीवृंद, प्रिंटर,स्टेशनरी इ. अनुषंगिक बाबी उपलब्ध करुन देण्याबाबतची कार्यवाही करावी.

६. श्री.के.पी.बक्षी, निवृत्त अपर मुख्य सचिव, एक सदस्सीय समिती यांना मानधन देण्याबाबत तसेच कालावधीबाबत स्वतंत्रपणे आदेश निर्गमित करण्यात येतील.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८२८१५४४५०७७०७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Somnath Namdeo Bagul

Digitally signed by Somnath Namdeo Bagul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, cn=Somnath Namdeo Bagul
Date: 2017.08.28 15:35:22 +05'30'

**( सो. ना. बागुल )**

सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग

**प्रति,**

१) राज्यपालांचे सचिव.
२) मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव.
३) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई.
४) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
५) प्रधान सचिव,महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई
६) प्रधान सचिव,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ,मुंबई
८) महालेखापाल-१(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),मुंबई
९) श्री.के.पी.बक्षी, निवृत्त अपर मुख्य सचिव, एक सदस्सीय समिती.
१०) उप सचिव (आस्थापना),उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई
११) निवड नस्ती,कार्यासन-२१.